GR-200408271545540001-0100

**गोपनीय**

विहित वयोमर्यादेनंतर शासकीय सेवेत राहण्याची शासकीय कर्मचाऱ्यांची पात्रापात्रता—पुनर्विलोकनावर आधारित शासन निर्णयाची नोंद घेणे. . . .

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

परिपत्रक क्रमांक विपुस-१०८४/पंधरा, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक २ एप्रिल १९८५

**संदर्भ**.— (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०७७/पंधरा, दिनांक २ सप्टेंबर, १९७७.
(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०७८/पंधरा, दिनांक १२ जानेवारी, १९७९.
(३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरसी-१०८२/९५२/पंधरा, दिनांक १ सप्टेंबर, १९८३.

## परिपत्रक

शासनाच्या प्रचलित आदेशांनुसार विहित वयोमर्यादेनंतर शासकीय सेवेत राहण्याबद्दलची शासकीय कर्मचाऱ्यांची पात्रापात्रता अजमावून पहाण्यासाठी विशेष पुनर्विलोकन समित्यांकरवी त्यांच्या प्रकरणांचे पुढीलप्रमाणे पुनर्विलोकन केले जाते :—

| | |
|---|---|
| (अ) वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी शासन सेवेत आलेले वर्ग १ व २ चे अधिकारी. | वयाची ५० वर्षे पूर्ण होण्यापूर्वी किंवा अर्हकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होण्यापूर्वी. |
| (ब) वयाच्या ३५ व्या वर्षानंतर शासन सेवेत आलेले वर्ग १ व २ चे अधिकारी. | वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी. |
| (क) वर्ग ३ चे कर्मचारी .. | वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी. |
| (ड) दिनांक २१ सप्टेंबर १९७० रोजी किंवा त्या तारखेनंतर सेवेत आलेले चतुर्थ श्रेणीचे कर्मचारी. | वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी. |

२. संबंधित विशेष पुनर्विलोकन समितीच्या शिफारशींच्या आधारावरील शासनाचा/विभागप्रमुखांचा निर्णय संबंधित अधिकाऱ्याला/कर्मचाऱ्याला कळविण्याची प्रथा नाही. शासनाचा/विभागप्रमुखांचा निर्णय "एखाद्या अधिकाऱ्यास/कर्मचाऱ्यास सेवेतून निवृत्त करावे" असा असल्यास त्याला मुदतपूर्व सेवानिवृत्तीची नोटीस दिली जाते. परंतु सेवेत ठेवण्याबद्दलचा निर्णय संबंधित अधिकाऱ्यास/कर्मचाऱ्यास कळविला जात नाही. अशा निर्णयाची नोंद संबंधित अधिकाऱ्याच्या/कर्मचाऱ्याच्या सेवा अभिलेखात कोणत्या प्रकारे घ्यावी हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

३. याबाबतीत शासनाने असा निर्णय घेतला आहे की, विहित वयोमर्यादेनंतर शासन सेवेत ठेवण्याबद्दलचा शासनाचा/विभागप्रमुखांचा निर्णय कळविणाऱ्या सामान्य प्रशासन विभागाच्या/विभागप्रमुखांच्या पत्राची प्रत संबंधित अधिकाऱ्याच्या/कर्मचाऱ्याच्या गोपनीय अभिलेखावर ठेवली जावी. मात्र असा निर्णय संबंधित अधिकाऱ्यास/कर्मचाऱ्यास कळविला जाऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मुकुन्द स. मोकाशी,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग,
महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहायक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व सचिव,
मंत्रालयाच्या विभागांतर्गत सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख,
मंत्रालयाचे सर्व विभाग.